**मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयाच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि. ०१. ०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०२५/प्र.क्र.१४९/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३० एप्रिल, २०२५

**संदर्भ** - १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र.क्र जा.क्र.३०८/आ-१/प्रा.का./ मु.प्र./ बृधाक्र.१५३९ /२०२५, दि.२२.०१. २०२५
२) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. आढावा १००२/(३३५/२००२)/आ (प्रशि), दि.०६.०२.२००३
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३.०३.२०२५,
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.-मुदतवाढ-२०२४/प्र.क्र.३१७/मोप्र-२,दि.२२.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांची निर्मिती संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. संदर्भीय क्र.४ च्या शासन निर्णयान्वये नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१.०९.२०२४ ते दिनांक २८.०२.२०२५ पर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्रमांक ३ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. त्यानुसार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती यांचे संदर्भ क्र. १ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आता मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना सोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत खालील अटींचे अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

३) सदर पदे आकृती बंधानुसार मंजूर असतील.

४) उपरोक्त सर्व पदे व्यपगत झालेली नसतील.

उपरोक्त कार्यालयातील खर्च, मागणी क्रमांक आय- ५, (नियत अस्थायी आस्थापना), मुख्य लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (योजनेत्तर) (८०) सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०४) योजनेत्तर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (संगणक संकेतांक ४७०१ आय १७१) या लेखाशीर्षाखाली महामंडळास मंजूर असलेल्या नियत अस्थायी आस्थापनेच्या वेतनाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि. ०३.०३.२०२५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४३०१४२८२३९८२७ असा आहे. हा कार्यालयीन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VRISHALI VINOD BHINGARDE

Digitally signed by VRISHALI VINOD BHINGARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT., 2.5.4.20=0863fc5c9cdcc85881943ea0d1a5438c42d27c0b1580feba557980045 2b60209, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6B870A94454E2B13EE0959C3370D5D53D60A17D4B6D3ED607 7E40A0F53E7A053, cn=VRISHALI VINOD BHINGARDE
Date: 2025.04.30 14:29:33 +05'30'

**सहपत्र- परिशिष्ट 'अ'**

**( वृषाली भिंगार्डे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत- सहपत्रासह-**

१) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
२) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखापरीक्षा) नागपूर,
३) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
४) वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,
५) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर,
६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती,

यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी /कर्मचाऱ्यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील.

७) मोप्र-(२) कार्यासन, निवडनस्ती.

## परिशिष्ट अ

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ -२०२५/२८९/प्र.क्र.१४९/मोप्र-२, दिनांक ३०.०४.२०२५ चे सहपत्र नियत अस्थायी आस्थापनेवरील खालील नमूद ३० पदांना दि. ०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ**

| अ.क्र. | पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | |
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता/सहा.अभियंता श्रेणी-२ | ३ | ३ |
| ५ | विशेष अधीक्षक | १ | १ |
| ६ | प्रमुख आरेखक | १ | १ |
| ७ | लघुलेखक उच्च श्रेणी/निम्न श्रेणी | १ | १ |
| ८ | अधीक्षक | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| ११ | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनीचालक | १ | १ |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |
| | **एकूण मुदतवाढीची पदे - ३०** | | |